20040812145659001-1700

पिंपळवाडी प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार म्हाडाने संपादित केलेल्या आणि यापुढे संपादित करावयाच्या उपकरप्राप्त इमारतीच्या पुनर्बांधणीकरीता धोरण ठरविण्यासाठी अभ्यासगट गठीत करण्याबाबत........

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्र.एमआरबी १०९९/प्र.क्र.२४१/दुवपु-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १३ मे,२००३

संदर्भ : १) पिंपळवाडी प्रकरणामध्ये मा.सर्वोच्च न्यायालयातील सिव्हील अपील क्र.४०६३-४०६४/२००२ आणि त्या अनुषंगाने शासनाने दि.१५.२.२००३ व ५.३.२००३ अन्वये शपथपत्राद्वारे सादर केलेली योजना तसेच या प्रकरणामध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेला दि.७.३.२००३ रोजीचा निर्णय.

२) इराणी चाळी प्रकरणात मा.उच्च न्यायालयात दाखल झालेली याचिका क्र.६५१/२००२ आणि त्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालयाने दिलेला दि.२.५.२००३ रोजीचा निर्णय.

३) जुनी चिखलवाडी प्रकरणामध्ये दाखल झालेली याचिका क्र.११५०/२००२ व १२६३/२००२ मध्ये शासकीय वकीलाचे दि.३ एप्रिल,२००३ चे पत्र.

## प्रस्तावना

संदर्भाधिन प्रकरणांमध्ये शासनाने शपथपत्र दाखल केले असून, सदर शपथपत्राद्वारे मुंबई बेटावरील जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतीखालील संपादित झालेल्या आणि संपादित करावयाच्या जमिनीचा पुनर्विकास करण्यासंबंधात योजना सादर करण्यात आली होती. शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात/मा.उच्च न्यायालयात सादर केलेली शपथपत्रातील योजना मान्य करण्यात आली असून, या योजनेच्या अनुषंगाने पुनर्बांधणीचा कार्यक्रम जलद गतीने करण्यासाठी विकास नियंत्रण नियमावलीखाली काही मार्गदर्शक तत्वे निश्चित करणे आवश्यक आहेत. तसेच पुनर्विकास कार्यक्रमाची अंमलबजावणी करतांना पारदर्शकतेच्या दृष्टीकोनातून सर्वसामान्य भाडेकरुना योजना समजावी, यावर उपाययोजना करण्यासाठी दि.७.५.२००३ रोजी म्हाडा व प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांच्या समवेत एक बैठक आयोजित करण्यात आली होती. बैठकीत ठरल्याप्रमाणे सर्वसमावेशक धोरण निश्चित

करण्यासाठी सर्वसंबंधित विभागाच्या अधिका-यांचा एक अभ्यासगट गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला.

शासन निर्णय :- पिंपळवाडी, इराणी चाळ आणि जुनी चिखलवाडी या प्रकरणामध्ये अनुक्रमे मा.सर्वोच्च न्यायालयाने आणि मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार मुंबई बेट शहर क्षेत्रातील जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतीखालील जमीनी म्हाडाने संपादित केलेल्या आणि भविष्यात संपादित करावयाच्या इमारतींच्या पुनर्बांधणीसंबंधात धोरण ठरविता यावे, याकरीता शिफारस करण्यासाठी खाली दर्शविल्याप्रमाणे अभ्यासगट गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | उपाध्यक्ष व कार्यकारी अधिकारी, म्हाडा | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, मुं.इ.दु. व पु.मं. | सदस्य सचिव |
| ३. | मुख्य अभियंता, विकास आराखडा, म.न.पा.,मुंबई | सदस्य |
| ४. | मुख्य अभियंता, म्हाडा | सदस्य |
| ५. | उप सचिव, नगर विकास विभाग | सदस्य |
| ६. | उप सचिव, गृहनिर्माण विभाग | सदस्य |
| ७. | विधी सल्लागार, म्हाडा | सदस्य |

पिंपळवाडी प्रकरणामध्ये (संदर्भ क्र.१) शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात केलेल्या शपथपत्राच्या अनुषंगाने संदर्भामधील क्र.३ नुसार शासनाकडून मा.उच्च न्यायालयामध्ये धोरण सादर करावयाचे आहे. म्हणून अभ्यासगटाने आपल्या शिफारशी या शासन निर्णयाच्या तारखेपासून १० दिवसांच्या आत शासनास सादर करावा.

अभ्यासगटाच्या सदस्य सचिवांनी अभ्यासगटाच्या बैठका केव्हा व कोठे घ्याव्यात, याबाबत अभ्यासगटाच्या अध्यक्षाची पूर्वसंमती घेऊन, त्याप्रमाणे बैठकांचे आयोजन करावे. तसेच या विषयातील तज्ञ व अनुभवी व्यक्तींना अभ्यासगटाच्या उपयुक्ततेच्या दृष्टीने तात्पुरते स्विकृत सदस्य म्हणून नियुक्तीचे अधिकार अभ्यासगटाच्या अध्यक्षांना असतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

निर्गमित 13 MAY 2003

(सी.के.जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे अवर सचिव